सहकार खात्याच्या लेखापरीक्षण कक्षातील ७७० अस्थायी पदांना दि.१/३/२०१५ ते दि.३१/८/२०१५ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत-

**महाराष्ट्र शासन**

**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्र. राजस २०१५/प्र.क्र.१०९/ ५ स**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक :- २ मे, २०१५

वाचा :- १) शासन निर्णय क्र.- राजस-१००८/ प्र.क्र.५३८/ ५-स, दि. ५.५.२०११

२) शासन निर्णय क्र. राजस २४१३/ प्र.क्र.१११/ ५ स दि. ३०/६/२०१४

३) अपर निबंधक, सहकारी संस्था (प्रशासन), सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था पुणे यांचे पत्र क्र.आस्थापना/कक्ष-१/नियमित पदे/ मुदतवाढ/१७६/२०१५, दि.२६/२/२०१५ व क्र.३८७/२०१५, दि.२२/४/२०१५.

४) वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि २०१५/प्र.क्र.५/१५/वित्तीय सुधारणा-१, दि.२०/२/२०१५

**शासन निर्णय :-**

सहकार खात्यातील लेखापरिक्षण कक्षातील ७७० अस्थायी पदांना संदर्भाधिन क्र.२ येथील दि.३०/६/२०१४ च्या शासन निर्णयान्वये दिनांक १/५/२०१४ ते २८/२/२०१५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता दिलेली आहे. प्रशासकीय कारणास्तव सदर पदे पुढे चालू ठेवणे आवश्यक आहे. सबब, सदर पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा अधिक काळ रिक्त नाही तसेच शासन निर्णय दि.५.५.२०११ अन्वये निश्चित केलेल्या आकृतिबंधात उक्त पदांचा समावेश आहे, या अटीच्या अधीन राहून सदर ७७० अस्थायी पदे दिनांक १/३/२०१५ ते ३१/८/२०१५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदर पदांचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

**पदांचा तपशील**

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | अप्पर निबंधक सहकारी संस्था, मुख्यालय, पुणे | १ |
| २ | विभागीय सहनिबंधक/सहनिबंधक (लेखापरिक्षण) | ८ |
| ३ | विशेष लेखापरिक्षक वर्ग १ | ३९ |
| ४ | विशेष लेखापरिक्षक वर्ग २ | २१ |
| ५ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | १ |
| ६ | लेखापरिक्षक, श्रेणी १ | ४२ |
| ७ | लेखापरिक्षक श्रेणी २ | १८७ |
| ८ | उपलेखापरिक्षक | १८५ |

| | | |
|---|---|---|
| ९ | लघुटंकलेखक | १ |
| १० | कनिष्ठ लिपिक | १३६ |
| ११ | वाहन चालक | ८ |
| १२ | नाईक/शिपाई | १४१ |
| | **एकूण** | **७७०** |

३. उपरोक्त ७७० अस्थायी पदांची (नियमित पदे) जिल्हा निहाय विगतवारी सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे हे स्वतंत्ररित्या प्रस्तूत करतील.

४. सदरहू पदे चालू ठेवल्यामुळे येणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०१५-२०१६ हया वित्तीय वर्षासाठी त्या शिर्षाखाली मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

"मागणी क्र.व्ही-२
२४२५- सहकार,
००३- प्रशिक्षण,
१०१ - सहकारी संस्थांची लेखापरीक्षा
(०१) (०१) लेखापरीक्षेसाठी कर्मचारी वर्ग (२४२५ ०२२७)"

५. वित्त विभाग, शासन निर्णय, दि.२०/२/२०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्या संगणक सांकेतांक २०१५०५०२१७४३४७१९०२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pandurang S Deokar
Digitally signed by Pandurang S Deokar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pandurang S Deokar
Date: 2015.05.02 18:12:53 +05'30'

**( पां.स.देवकर )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरिक्षण), कोल्हापूर विभाग, कोल्हापूर,

३. अप्पर निबंधक, सहकारी संस्था (लेखापरिक्षण) आयुक्त कार्यालय, पुणे,

४. साखर संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे

५. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,

६. संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर,

७. सर्व सहनिबंधक (लेखापरिक्षण), सहकारी संस्था

८. सर्व जिल्हा विशेष लेखापरिक्षक, सहकारी संस्था,

९. महालेखापाल १, महाराष्ट्र मुंबई (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)

१०.महालेखापाल २, महाराष्ट्र नागपूर (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)

११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

१२.निवासी लेखा अधिकारी, मुंबई,

१३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

१४.उप कोषागार अधिकारी, वाशी, नवी मुंबई,

१५.वित्त विभाग (व्यय २/अर्थसंकल्प १९)

१६.कार्यासन अधिकारी १७ स, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,

१७.निवड नस्ती (५ स)